**वेतन आयोगाच्या अनुषंगाने निवृत्तीवेतन/कुटुंब निवृत्ती वेतनाबाबत येणा-या तक्रारींचे निवारण करण्यासाठी समन्वय अधिका-याची नियुक्ती करणेबाबत.**

***महाराष्ट्र शासन***
सामान्य प्रशासन विभाग
शासन परिपत्रक क्रमांकःसेनिवे-२०१०/प्र.क्र.१११/का.२८.
मंत्रालय,मुंबई-४०००३२
दिनांक : **२९ मार्च, २०१०.**

**वाचा :-** (१)शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांकःसेनिवे-१०१०/प्र.क्र.१६/सेवा-४ दिनांक : ०३/०२/२०१०.
(२)शासन पृष्ठांकन पत्र क्रमांकःसंकीर्ण-१०१०/प्र.क्र.४९/२०१०/१९-अ, दिनांक : ०३/०३/२०१०.

## शासन परिपत्रक

राज्यातील निवृत्तीवेतन धारकांच्या निवृत्तीवेतनात सहाव्या वेतन आयोगाच्या अनुषंगाने सुधारणा करण्याचे आदेश निर्गमीत करण्यात आलेले आहेत.या आदेशांच्या तसेच निवृत्तीवेतन धारकांना येणा-या अडचणी/मिळणारे लाभ इत्यादीची माहिती मिळण्याकरीता तसेच पाचव्या वेतन आयोगाच्या अनुषंगाने निवृत्तीवेतन धारक/कुटुंब निवृत्तीवेतन धारकांच्या निवृत्तीवेतनात अद्यापही सुधारणा न झाल्याच्या तक्रारी संदर्भात या बाबतची माहिती निवृत्तीवेतन धारकांना देवून त्यांच्या अडचणी दूर करण्यासाठी श्री.अ.द.जोशी, अवर सचिव (मा.सै.क.), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई यांची "समन्वय अधिकारी" म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे. या विभागाच्या अधिनस्त असलेल्या सैनिक कल्याण विभाग, पुणे/ अधिनस्त कार्यालये व सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, औरंगाबाद या कार्यालयातील सर्व निवृत्तीवेतन धारक/कुटुंब निवृत्तीवेतन धारक यांनी त्यांच्या तक्रारी संदर्भात श्री.अ.द.जोशी, अवर सचिव (मा.सै.क.), सा. प्र. वि. यांचेकडे संपर्क साधावा. त्यांचा पत्ता खालील प्रमाणे आहे :-

नांव :- श्री.अ.द.जोशी, अवर सचिव(मा.सै.क.), सामान्य प्रशासन विभाग,
पत्ता :- नविन प्रशासन भवन, १३ मजला, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
कार्यालयीन दुरध्वनी क्रमांक : २२८५०४१० व विस्तार ३११२.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक संकेतांक **२०१००३२९१६४९५०००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही/-
(निं.बा.रायलापूरकर)
सह सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
श्री.अ.द.जोशी, अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
संचालक, सैनिक कल्याण विभाग, महाराष्ट्र राज्य यांचे कार्यालय, रायगड, राष्ट्रीय युध्द स्मारकासमोर, सोलापूर रस्ता,घोरपडी, पुणे-४११ ००१.
संचालक, सैनिकी सेवापूर्व शिक्षण संस्था, सिडको, एन-१२, सेक्टर-३,मौलाना आझाद कॉलेजमागे, नवीन औरंगाबाद-४३१ ००३.
सर्व जिल्हा सैनिक कल्याण अधिकारी.
अवर सचिव,सामान्य प्रशासन विभाग/(१९-अ),मंत्रालय,मुंबई-३२
अवर सचिव, वित्त विभाग/(का.सेवा-४)
निवड नस्ती-का.२८.